वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०२३-२४ करीता नांदेड जिल्ह्यातील कामांना प्रशासकीय मान्यता व निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : तांसुयो-२०२४/प्र.क्र.२५२/योजना-१**
नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०५ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०१७/प्र.क्र.८४/योजना-१, दि.३०.०१.२०१८.
२) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजना, नांदेड यांचे क्र. ४८१, दि.३०.०१.२०२३ व क्र.४६९५, दि.२६.०७.२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात विमुक्त जाती भटक्या जमाती प्रवर्गात अनेक जाती, जमाती असून अद्यापही भटकंती करुन स्थलांतरीत स्वरुपाचे जीवन जगत आहेत. लमाण, बंजारा, वंजारी, धनगर, पारधी अशा अनेक समूहांचे तांडे / वस्त्या असून अशा तांड्यामध्ये या जाती /जमातीचे लोक अनेक वर्षापासून राहत असले तरी, अशा तांडे किंवा वस्त्यांना प्राथमिक सुविधा उपलब्ध होत नाहीत व त्यामध्ये आधुनिकतेकडे कल असला तरी या प्रवर्गातील बहुसंख्य समाज गरीबी चे जीवन जगत आहे. तांडे, वाडी किंवा वस्त्या यामध्ये सध्या या प्रवर्गातील समाज ज्या ठिकाणी वास्तव्यास आहे त्याच ठिकाणी या समाजास स्थिर जीवन जगता यावे याकरीता त्यांना काही अत्यावश्यक पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेच्या अंमलबजावणीसाठी वाचा येथील क्र.१ च्या शासन निर्णयान्वये सविस्तर सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/ वस्ती सुधार योजना जिल्हास्तरीय समिती, नांदेड यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीने मान्यता देऊन शिफारस केलेल्या कामांचा प्रस्ताव वाचा क्र.२ अन्वये शासनास प्राप्त झाला आहे. त्यानुषंगाने, सदर प्रस्तावातील कामांना प्रशासकीय मान्यता व निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत जिल्हास्तरीय समितीने शिफारस केलेल्या नांदेड जिल्ह्यातील ६ कामांना (परिशिष्ट-अ प्रमाणे) प्रशासकीय मान्यता व सदरहू कामांना आवश्यक असणारा रु.४५,००,०००/- (अक्षरी रुपये पंचेचाळीस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक- इमाव-२००३/ प्र.क्र. २०५/मावक-३, दिनांक ७ जून, २००३ मध्ये नमूद केलेल्या तसेच, शासनाने यासंबंधी वेळोवेळी दिलेले आदेश / परिपत्रकाप्रमाणे सन २०२३-२४ मध्ये मंजुर करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावा.

३. याद्वारे मंजूरी देण्यात आलेली व हाती घेण्यात येणारी परिशिष्ट-अ मध्ये नमूद कामे ही शासनाच्या किंवा स्थानिक स्वराज्य संस्थांच्या किंवा आमदार/खासदार किंवा अन्य कोणत्याही योजनेतून यापूर्वी मंजूर झाली नाहीत किंवा करण्यात आली नाहीत याची खात्री करुन हाती घेण्यात यावीत.

४. सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील कामांचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करुन त्याला सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

५. सदरहू कामांकरीता संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे "नियंत्रक अधिकारी" म्हणून काम पाहतील. तसेच, कामांकरीता उपलब्ध करुन दिलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात येत असल्याचे व काम गुणवत्तेनुसार झाले आहे किंवा कसे, तसेच मंजूर करण्यात आलेला निधी मंजूर कामावरच खर्च झाला आहे किंवा कसे हे संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी पहावे.

६. याद्वारे मंजूर कामांवर निधी खर्च करतांना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे व नियमांचे तसेच विहित प्रक्रियेचे अवलंबन करण्यात यावे. निधी खर्च करण्याबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयातील सूचनांचा व वित्तीय अधिकाराच्या मर्यादेचा भंग होणार नाही तसेच, कुठल्याही शासन निर्णय / अधिकारांचा भंग होणार नाही हे संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी पहावे.

७. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण व समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांचे या कामांवर प्रत्यक्ष नियंत्रण राहील व ते या कामाच्या प्रगतीचा अहवाल संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना व शासनास न चुकता सादर करतील.

८. सदर निधी वितरीत करण्यासाठी उप सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून तसेच सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नांदेड यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, सदरहू निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नांदेड यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी कामाबाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा व याबाबत महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

९. यावरील खर्च “मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ८०-सर्वसाधारण, १०२-स्वयंसेवी संस्थांना मदत, (०२) तांडा वस्ती सुधार योजना,(०२)(०१) विजाभज आणि विमाप्र यांच्यासाठी तांडा वस्ती सुधार योजना (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (कार्यक्रम) (दत्तमत) (२२२५ एफ ०५८)” या लेखाशिर्षांतर्गत २०२३-२४ या वर्षात उपलब्ध आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०५१८३८२२९६३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHANT SHRIRANG KUMBHAR

Digitally signed by SUSHANT SHRIRANG KUMBHAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2121bd11b9a537ffee960f52794a0a1244969254517ad088cf267eaedf9b53f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5E8A8657AC266FF9154647CC20900A57B2BA9AD3DB088D187EB151F2E10F16C3, cn=SUSHANT SHRIRANG KUMBHAR
Date: 2024.03.05 18:47:21 +05'30'

**( सु. श्री. कुंभार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना, नांदेड.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.
१३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
१४. महालेखापाल महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
१५. उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग (प्रादेशिक), लातूर.
१६. सहायक आयुक्त, समाज कल्याण / सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, नांदेड.

१७.जिल्हा समाजकल्याण अधिकारी, नांदेड.

१८.जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.

१९. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

२०. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१. उप सचिव (का-१४१३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

२२. उप सचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

२४. निवडनस्ती (योजना-१).

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : तांसुयो-२०२४/प्र.क्र.२५२/योजना-१**

दिनांक : ०५ मार्च, २०२४.

**परिशिष्ट अ**

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०२३-२४ करीता प्रशासकीय मान्यता देण्यात येत असलेल्या नांदेड जिल्ह्यातील कामांचा तपशील

(रु. लक्षमध्ये)

| अ. क्र. | तालुका | ग्रामपंचायतीचे नाव | तांडा/वस्तीचे नाव व लोकसंख्या | कामाचे स्वरुप | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | किनवट | निचपूर | सेवालाल नगर तांडा (१२०) | सिमेंट रस्ता/ सी.सी.नाली | १०.०० |
| २ | | | भगवानबाबा नगर (१७२) | सिमेंट रस्ता/ सी.सी.नाली/ सभागृह /विद्युतीकरण | ५.०० |
| ३ | | | वंजारवाडा (१८६) | सिमेंट रस्ता/ सी.सी.नाली/ सभागृह / विद्युतीकरण | ५.०० |
| ४ | | | गोपिनाथ राव नगर (२७०) | सिमेंट रस्ता/ सी.सी.नाली/ सभागृह /विद्युतीकरण | ५.०० |
| ५ | माहूर | वझरा (शे.फ.) | सेवादास तांडा (२११) | सिमेंट रस्ता/ सी.सी.नाली | १०.०० |
| ६ | | मुंगशी | मुंगशी ताडा (२८५) | सिमेंट रस्ता/ सी.सी.नाली | १०.०० |
| | | | | **एकूण** | **४५.००** |

SUSHANT SHRIRANG KUMBHAR

Digitally signed by SUSHANT SHRIRANG KUMBHAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2121bd11b9a537ffee960f52794a0a1244969254517ad088cf267eaedf9b53f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5E8A8657AC266FF9154647CC20900A57B2BA9AD3DB088D187EB151F2E10F16C3, cn=SUSHANT SHRIRANG KUMBHAR
Date: 2024.03.05 18:47:52 +05'30'

**( सु. श्री. कुंभार )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**